आठवणींचा गंध येता
दाहीदिशा फक्त भासच.....
अशात मन कधी वा-यावर
तर कधीतरी उगाचच.....

# कधीतरी उगाचच

ई-साहित्य प्रतिष्ठान, वर्ष तिसरे, अंक १२, २१ मार्च २०११



: संपादक :

**सचिन काकडे (मुंबई)**

: सह संपादक :

**सोनाली घाटपांडे (पुणे)**

**भारती सरमळकर (मुंबई)**

**स्वप्ना कोल्हे (नाशिक)**

**शशिकांत रणवरे (मुंबई)**

**सारंग भणगे (पुणे)**

कधीतरी सगळं शांत होतं...
संथपणे ओघळत्या संध्याकाळच्या उन्हासारखं...
पहिल्या पावसात भिजलेल्या चिंब चिंब मनासारखं...



भर घरात शिरल्यावर अडगळ खोलीपर्यंत धावणा-या वा-यासारखं...
आभाळी तुटणा-या मंद मंद ता-यासारखं...
कधीतरी सगळं कसं शांत, शांत ...
अन, फ़क्त एकांत..
एकांतक्षणी , एक अंत मनी,
एकांतपाऊल, एकांतवाट
याच वाटेवर सुरु होतो प्रवास
परत मागे, मागे. . मागे. . . जात..जात..
दुःखांची अगणित वळणं सापडात. . .
उदास रडणारी, विव्हळणारी....
पण या खुणा ठेवल्या
अन, आधी जगल्या वाटेला त्यांच काही नसतं
आपण फ़क्त जगायचं अन तिच्यासोबत चालयचं असतं
खरंच तिला या जखमांच कधीच काही वाटत नाही
वाटतं आपल्याला असंच

कधीतरी उगाचच.......

संपादक
**सचिन काकडे - मुंबई**

# लिहितो उगाच आहे.....

कळले मला कधी ना
लिहितो उगाच आहे
शब्दात अर्थ माझ्या
दिसतो उगाच आहे

मी मेघ भारलेला
फ़िरतो उगाच आहे
माझ्यातल्या जलाने
भिजतो उगाच आहे

बरसलो इथे-तिथे मी
उरलो उगाच आहे
गर्भात पोकळीच्या
जगतो उगाच आहे

संन्यस्त मी स्वतःला
म्हणतो उगाच आहे
हा मोगरा उशाशी
कण्हतो उगाच आहे

दुनियेत मी स्वतःच्या
रमतो उगाच आहे
निःश्प्राण प्रेत माझे
सजवितो उगाच आहे

**सॅम - महेंद्र कुलकर्णी**
कल्याण

# आठवते मग उगाच काही......

आठवते मग उगाच काही
ध्यानी मनी ही नसताना
नदी तीरावर भणभण वारा
उगाच हळवा होताना

स्मरते मग ती ओली माती
बोटांमधुन सुटणारी
आणि कुठेशी खिळुन राहते
पदराने हळू टिपताना
आठवते मग उगाच काही
ध्यानी मनी ही नसताना

नुरते मग मज भान कशाचे
नदीतीराच्या त्या खडकावर
जिथुन पाहिले लहरींमधले
बिंब तुझे विरघळताना
आठवते मग उगाच काही
ध्यानी मनी ही नसताना

**सौ. सुरुचि नाईक**
नागपुर

# उगाच.....

उगाच हसणे उगाच रडणे
येणे-जाणे उगाच हे
अर्थालाही अर्थ नसावा ?
विश्व सारे उगाच हे

शोध कशाचा घ्यावा कोणी?
शोधुन उत्तर सापडते ?
अंत 'कुणाला' नसतो येथे
तळात जाणे, उगाच हे

प्रवास खोटा , ध्येयही खोटे
खोटे जळणे, विझणेही
भासांमधुन श्वास हुडकणे
फ़सणे सारे उगाच हे
अनुभवांची अनुभूती अन
पिकले-गळले केस इथे
कळले नाही कुणास आखी
जगणे सारे उगाच हे

**मंगेश दाभाडे**

# उगाच सुखिया जिवडा व्हावा....

उगाच सुखिया जिवडा व्हावा
डोळयांच्या या खाचा झाल्या
तरी राम तो सदा दिसावा
बहिरे झाले कान तरीही
मंजुळ पावा ऐकू यावा

मीठ-भाकरी पुढ्यात येता
पक्वांनाचा घासच व्हावा
असो कशीही बाह्य परीस्थीती
अंतरात परी आनंद रहावा

बेड्या पडल्या, टाळे पडले
तरीही त रावा नभी उडावा
फ़िरुनी येता जन्माला मी
पहिल्या गावा मोक्ष स्मरावा

दग़डावरुनी हातही फ़िरता
मउशार तो मज लागावा
बाहेर असो कुठलाही गंध
श्वास सुगंधी होऊनी जावा

वादळ-वारे सुटल्यावरही
मंदिरातला दिवा जळावा
सुखात असण्या नकोच कारण
उगाच सुखिया जिवडा व्हावा

**स्वर्गीय अहं ब्रम्हास्मी**
पुणे

# तु हास उगाच.....

तु हास उगाच
हास उगाच
उगाच हास

कशी तुज समजावु सांग ?
का भामिनी उगा उदास ?
आज नाही जात कविसम्मेलनांस
नको करु धम्मक लाडु उगाच
हास उगाच

कधी तुज समजावू सांग
का भामिनी उगीच राग
आज ऐकवतो हास्य कविता
नको करु चिंता उगाच
हास उगाच

कशी तुज समाजावू सांग
का भामिनी उगीच राग़
आज जागत नाही करीत कविता
घोरत झोपतो , जाग तु एकटी
हासत उगाच

कशी तुज समजावु सांग ?
का भामिनी उगाच राग ?
आज समजुन घेतो मी तुला
समजलो नाही मी तुला तरी
तु हास उगाच
हास उगाच
उगाच हास

**अतुल मुळये**
पुणे

# एक सांगु ????

एक विचारु ?
ह्या एक विचारण्यात अनेक गोष्टी विचारायचास तु
अगदी अथ पासुन अंतापर्यंत
अन मग त्यावर चर्चा होत राहयची
उगाचच

एक सांगु ??
एका सांगण्यात किती गोष्टी सांगायचास तू
मनात येणारं सगळं काही
माझी ओढ, माझी काळजी
संगळच यायच त्यात . . हे ही उगाचच . . .?

ऐक ना
आता काय ? ऐकतेच आहे ना ?
ऐक ना अन बोलत राह्याचास तू
किती तरी वेळ . . काही उपयोगी काही निरर्थक
उगाचच. . .

किती दूर गेलास तू.. नजरेआड मनाच्या पार

एक सांगू ? ?
आता परत येऊ नकोस
बंद कवाड उघडणार नाही
साचलेल्या आठवणींवरचा धुरळा उडवणार नाही
उगाचच कशाला त्रास तुला अन त्याहुनी जास्त
मला. .
म्हणुनच सांगते
(सांगायची गरज आहे का ?)

**स्वाती देशमुख**
ठाणे

# उगाच तुझिया......

उगाच तुझिया आठवणींची
झुळुक लाघवी मनात शिरते
उगाच नंतर तुझ्या दिशेला
नजर बावरी शोधत फ़िरते

उगाच आता दिवसाढवळ्या
स्वप्न येतसे तुझे गोजिरे
डोळ्यांमध्ये सदैव असते
तुजेह देखणे रुप साजिरे

उगाच आता लिहिता लिहिता
कवितेला ये गंध तुझा गं
उगाच माझ्या शब्दांनाही
गडे लागला बंध तुझा गं

उगाच आता संध्याकाळी
मनात येतो तुझाच वाड़ा
उगाच होते हुरहुर वेडी
क्षणात नंतर मनी पहारा

मलाच आता कळले नाही
असे काय हे उगाच होते
कोण ओढुनी मनास माझ्या
तुझ्या दिशेला उगाच नेते

**प्रशांत मडपुवार**

# का उगाच जगू मी ?

भग्नतेच्या शापकाला
स्वप्नमहालास माझ्या
रक्ताने केला कावा
आज हुंदक्यात माझ्या

मी समाधित होतो
फ़सव्याच जाणिवेच्या
कळले काहिसे जेव्हा
फ़ुटला बांध माझा

का आपल्याच नात्यांनी
मन उरातुन तोडले
बुडण्यास एकला मजला
काळ सागरी लोटले

हाक कुणा देऊ मी
माझा कुण म्हणु मी
मिटलेत जिव्हाळे सारे
का उगाच जगू मी ?

**शशांक प्रतापवार**
पुणे

## उगाच एक कविता

कशासाठी स्वप्नांचे तु जाळलेस दिवे
अन, आकाशी स्वप्नखगांचे माळलेस थवे

मी गंध होतो दरवळत गं आसपास
अन्य फुलांचे का गजरे तु माळलेस नवे

शय्येवरती तळमळताना एकाकी जळलीस तु
अन पेटलेल्या शृंगारांनां का जाळलेस सवे

**सारंग भणगे**
पुणे

# आज अचानक . . उगाचच

आज अचानक
शाळेतल्या पिंपळाची
पिंपळाखालच्या टाकितल्या थंड पाण्याची
उगाचच आठवण येतेय

मधल्या सुट्टीतली आमची football match
म्हणजे सगळ्या Juniors ना अगदी must watch

मराठी मधल्या धडे आणि कवितांमध्ये " अध्यक्ष" कोण ?
यावरुन नव्हता वाद
आणि एकचलीय असली तरी सगळी समीकरणं होती बाद

इतिहासात अजुन दोन "शिवजयंती " यायच्या बाकी होत्या
आणी मुख्या न्यायाधीशाच्या तीजो-या जनतेपुढे उघडायच्या बाकी होत्या

क्रिकेटला आता इतकं खो-खो चं वावडं नव्हतं
कबड्डी आणि लंगडीच ही खास कुणाशी वाकडं नव्हंतं

सामान्य माणसाच्या असण्याला तेव्हाही "अर्थ" नव्हता
आणी अफ़झलखानाच्या कोथळयाला कुणाचाच कधी विरोध नव्हता

कुणीतरी बोर्डात यावं असं याही वर्षी साकडं होतं
द्रोणाचार्य आणि एकलव्याचं इथेही थोडं वाकडंच होतं

प्रिलिमच्या वेळी कळुन चुकलं आता आमची झालीये पुरेवाट
सॅड ऑफ़ च्या दिवशी डॊळे नकळत भरलेले काठोकाठ

ती जादुची कांडी पुन्हा फ़िरेल काय ? ?अशी रुख रुख मनाला
वेड लावतेय. .
काय माहीत ??
शाळेतल्या पिंपळाची
पिंपळाखालच्या टाकितल्या थंड पाण्याची
उगाचच आठवण येतेय

**योगेश मोरे**
मुंबई

# उगाच मी

प्रेमपत्रं ती जुनाट चाळतो उगाच मी
आसवे तरी कधी न ढाळतो उगाच मी

आसपास श्वापदेच पाहतो अनेकदा
कायदे वनातले न पाळतो उगाच मी

वाद मी न घातले, न दादही दिली कुणा
बोलणे मिजासखोर टाळतो उगाच मी

वाळवंट नांगरून लोटले ऋतु किती ?
पाट कोरडेच, घाम गाळतो उगाच मी

राख सापडे कुणा न, दाह ना कळे कधी
वेदना उरात लाख जाळतो उगाच मी

**नीलहंस - सुजीत बलवाडकर**
पुणे

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने मागल्याच आठवड्यात नाबाद ८५चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

-----------------------------------------------------------------





